# जिहाद?

लेखक

सय्यद अबुल आला मौदूदी

अनुवाद

जाहिद आबिद खान



''अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे.''

(दिनांक १३ एप्रिल सन १९३९ रोजी 'यौमे एकबाल' (कवी इकबाल यांच्या जयंती) निमित्त टाऊन हॉल, लाहोर येथे मौलाना अबुल आला मौदूदी यांनी दिलेले भाषण...)

सामान्यपणे 'जिहाद' या शब्दाचा इंग्रजीत 'होली वॉर' (Holy War) अर्थात 'पवित्र युद्ध' असे भाषांतर केले जाते व अनुषंगाने दीर्घ काळापासून त्याबाबतचा खुलासा व वर्णनही त्याच अर्थाने केले जात आहे. आता तर त्याचा अर्थ 'वेडसर उत्साह' असा झाला आहे. 'जिहाद' शब्द उच्चारताच डोळ्यांसमोर हातात तलवारी घेऊन दाढी वाढलेले, लालबुंद डोळे असलेले, 'अल्लाहो अकबर'च्या घोषणा देत धर्मवेड्यांचा घोळका डोळ्यांसमोर उभा राहतो. हा वेडसर घोळका मुस्लिमेतरांना गाठतो व त्यांच्या मानेवर तलवार ठेवून दरडावून सांगतो की ''बोल, अल्लाहशिवाय इतर कोणीच आराध्य नाही! (ला इलाहा इल्लल्लाह) नाहीतर तुझे मुंडके उडवून देईन!''

दूषित मनोवृत्तीच्या मुस्लिमेत्तर कलाकारांनी आम्हा मुस्लिमांचे असे चित्र रेखाटले आहे व त्यासाठी ठळक अक्षरात लिहिले आहे,

''बू-ए-ख़ूँ आती है इस क़ौम के अफ़सानों से।''

(या समाजाच्या कथानकातून रक्ताचा गंध येत आहे.)

आश्चर्याची बाब अशी की जे लोक आमच्या बाबतीत असे (टीकात्मक) वर्णन करतात ते स्वतःच अपवित्र युद्धात गुंतलेले आहेत. ते संपत्तीलोलूप असून सर्व प्रकारच्या शस्त्रास्त्राने सज्ज होऊन जगावर खाटकासारखे तुटून पडले आहेत. सर्वत्र बाजारपेठा व नवीन वसाहतीलायक भूभाग व खनिज संपत्ती शोधत फिरत आहेत. कारण त्यांना त्यांच्या अघोरी प्रगतीसाठी ऊर्जा उपलब्ध करावयाची आहे. त्यांच्या युद्धाला नैतिक समर्थन प्राप्त नाही. ते स्वार्थाने मदमस्त झालेत व अहर्निश उपद्रव माजवीत आहेत. ज्या ज्या भागात खनिज संपत्ती, तेलाच्या विहिरी वा इतर वस्तूंचे साठे उपलब्ध आहेत, त्या भागांत ते या ना त्या निमित्ताने हल्ले करतात. त्यांना त्यांच्या देशातील उत्पादनासाठी नवनव्या बाजारपेठा हव्यात, त्यांना त्यांच्या देशातील लोकांसाठी, वसाहतीसाठी स्वतंत्र भूभाग हवे आहेत. इतकेच नव्हे तर त्यांच्या ताब्यात असलेल्या भूभागाच्या मार्गात

दुसरे देश येत असतील तर त्या देशांवरसुद्धा त्यांना ताबा हवा आहे. आपण रोजच त्यांच्या अन्यायकारक हल्ल्यांबाबत व युद्धाबाबत बातम्या ऐकत असतो.

आशिया, युरोप, आफ्रिका व अमेरिका यांतील कोणताच भूभाग त्यांच्या अत्याचारापासून सुरक्षित राहिलेला नाही. मात्र त्यांचे कर्तृत्व कौतुकास्पद आहे. त्यांनी आम्हा मुस्लिमांचे इतके भयानक चित्र रेखाटले आहे की त्यांचे स्वत:चे भयानक स्वरूप त्यांच्या मागे पूर्णत: झाकले गेले आहे. आमचा भोळा स्वभावसुद्धा कौतुकास्पद आहे. जेव्हा आमचे भयानक चित्र आमच्याच समोर ठेवण्यात येते तेव्हा त्या चित्राच्या मागे लपलेल्या चित्रकारांकडे आमचे लक्षच जात नाही. उलट आपण आवर्जून सांगू लागतो की सज्जनहो, आमचा रक्तपात व युद्धाशी काय संबंध? आम्ही तर भिक्षुक व ख्रिस्ती धर्मगुरूसारखे शांतताप्रिय धर्मप्रसारक आहोत. आम्ही काही धर्मपरंपरांचा विरोध करतो व काही धार्मिक तत्त्वांचा प्रचार करतो, बस्स! आमचे एवढेच काम आहे. तलवारीशी आमचा काय संबंध?

हे मात्र खरे आहे की ज्या ज्या वेळी परकीयांनी आमच्यावर हात उगारला, आम्हीसुध्दा तसाच प्रतिकार केला. आता तर आम्ही तसेही करीत नाही. आपल्या समाधानासाठी आम्ही आता जिहादसाठी तलवारीचा उपयोग करू नये असे आदेश दिले आहेत. आता केवळ शब्द व लेखणीद्वारा आम्ही प्रयत्न करीत आहोत. बंदुकी व तोफा डागण्याचे काम तर सरकारचे आहे.

# जिहादबाबत गैरसमज निर्माण होण्याची कारणे

एकूण परिस्थितीचा बारकाईने विचार करता 'अल्लाहच्या मार्गातील जिहाद'बाबत मुस्लिमेतरच नव्हे तर स्वत: मुस्लिमांमध्येसुध्दा निर्माण होणाऱ्या गैरसमजाची दोन ठळक कारणे लक्षात येतात.

(१) इस्लामची परिभाषा इतर धर्मांच्या परिभाषेसारखी करण्यात आली आहे.

(२) मुस्लिमांना इतर समाजांसारखा एक समाज समजण्यात आला आहे.

या दोन कारणांमुळे केवळ 'जिहाद'बाबतच नव्हे तर इस्लामबाबतचा दृष्टिकोनच पार बदलून गेला आहे. मुस्लिमांबाबत पूर्णत: चुकीचा समज निर्माण करण्यात आला आहे.

सामान्यत: पूजापाठ करण्याची विशिष्ट पध्दत आणि काही रूढी व परंपरांच्या एकत्रित आचार व विचारपध्दतीस धर्म मानले जाते. धर्म ही एक खाजगी बाब समजली जाऊ शकते. तुम्हाला हवे त्याची भक्ती करावी व तुमच्या विवेकास पटेल त्याला आराध्य मानावे व जास्तच उत्साह असेल तर आपल्या वैचारिक तत्त्वांचा जगभर प्रचार करत फिरावे आणि इतर धर्मियांशी चढाओढ करत राहावे. अशा धर्मप्रसारास तलवारीची गरज भासत नाही.

लोकांना मारून झोडपून आपला भक्तिमार्ग स्वीकारण्यास विवश करणे कितपत योग्य ठरू शकते. इतर धर्मांच्या परिभाषेनुसार इस्लामचीही परिभाषा केल्यास जिहादचा प्रश्नच पूर्णत: संपुष्टात येतो.

समविचारी लोकांच्या समूहास समाज म्हटले जाते. ते आपल्या विशिष्ट प्रकारच्या समान चालीरीतीमुळे एकसंघ होऊन राहतात व प्रगत होतात. त्यांच्या न्याय्य हक्कांवर कोणीतरी हल्ला केल्यास किंवा दुसऱ्यांचे हक्क हिसकावण्याची त्यांची इच्छा वा योजना असल्यास त्यांना तलवार उगारावी लागते. पहिल्या कारणाचे तर नैतिकदृष्ट्या समर्थन करता येईल. (काही धर्मात्मा तर याचीही अनुमती देत नाहीत.) मात्र दुसऱ्या प्रकारच्या कृतीचे हुकूमशाहव्यतिरिक्त इतर कोणीही समर्थन करणार नाही. ब्रिटन, फ्रान्ससारख्या विशाल साम्राज्यवादी देशाचे मुत्सद्दी लोकही दुसऱ्यांचे हक्क हिरावून घेण्यासाठी युद्धास सहमती दर्शवीत नाहीत.

इस्लाम एक धर्म व मुस्लिम एक समाज गणला जात असेल तर इस्लामी

जिहादच्या मोहिमेला काहीच अर्थ राहत नाही. सत्यस्थिती अशी आहे की इस्लाम कोणत्याच धर्माचे नाव नसून मुस्लिम हा मुळी एक समाज गणलाच जाऊ शकत नाही. इस्लाम हे एका क्रांतिकारक दृष्टिकोन व जीवनशैलीचे नाव आहे. इस्लाम जगातील समाजव्यवस्थेत आमूलाग्र परिवर्तन घडवून नवीन समाजव्यवस्था अस्तित्वात आणू इच्छितो. मुस्लिम एक आंतरराष्ट्रीय क्रांतिकारी संघ (जनसमूह) आहे. तो इस्लामी तत्त्वानुरूप इष्ट क्रांतिकारी कार्यक्रम राबवू पाहात आहे. 'जिहाद' एक क्रांतिकारी चळवळ आहे, तिच्या शक्तीद्वारे मुस्लिम संपूर्ण जगात इष्ट परिवर्तन घडविण्याचा प्रयत्न करीत आहेत.

इतर सर्व क्रांतिकारी चळवळींच्या परंपरावादी परिभाषा बदलून इस्लाम एका नव्या अर्थाने क्रांती घडवू इच्छित आहे. त्या क्रांतीचे स्वरुप इतर क्रांतीपेक्षा निश्चितच वेगळे व श्रेष्ठतर आहे. 'जिहाद' शब्दालाही विशेष अर्थ प्राप्त आहे. इस्लामने 'हक़' (ज्याचा अर्थ युद्ध वा लढाई असा होतो) हा शब्द मुद्दाम टाळला आहे, त्याच्याऐवजी 'जिहाद' शब्दाचा उपयोग केला आहे. त्याचा अर्थ 'जिद्दीची पराकाष्ठा व प्रयत्न करणे' असा होतो. इंग्रजीत याचा अर्थ 'To exert one's utmost endavour in promoting a cause.' अर्थात आपल्या उद्देशपूर्तीसाठी आपल्या संपूर्ण सामर्थ्याचा उपयोग करणे असा होतो.

आता प्रश्न असा निर्माण होतो की युद्ध हा परंपरावादी शब्द सोडून 'जिहाद' या नव्या शब्दाचा वापर का करण्यात आला आहे? याचे उत्तर असे आहे की युद्धे दोन समाज वा राज्यांमध्ये होत असत व आजही होत आहेत. युद्धे सामान्यत: आपल्या स्वार्थी आकांक्षांकरिता लढली जातात. अशा युद्धाचे म्होरके (प्रणेते) ज्या उद्देशाकरिता लढत असतात त्यांच्यात कोणत्याच तत्त्व वा दृष्टिकोनाचा संबंध नसतो.

इस्लामी युद्धाचे स्वरुप पूर्णत: वेगळे आहे. म्हणूनच इस्लामने युद्ध या शब्दाचा मुळी वापरच केलेला नाही. इस्लामचे लक्ष्य केवळ एखाद्या समाजास फायदा मिळवून द्यावा असे नाही. कोणत्याच भूभागावर कोणाचे वर्चस्व वा राज्य असावे यातही इस्लामची रुची नाही. इस्लामला हवा आहे मानवजातीचा उध्दार! यासाठी त्याचा आपला एक वेगळा दृष्टिकोन आहे व एक वेगळी रचना आहे. त्या दृष्टिकोनाविरुध्द कोणत्याही समाजाची वा शासकाची राज्यव्यवस्था अस्तित्वात असेल तर तिला नष्ट करणे व तेथे इस्लामी तत्त्वप्रणाली लागू करणे आहे. कोण

त्यास सहकार्य देतो व कोणाच्या सत्तेचा विध्वंस घडून येतो याचा विचार केला जात नाही.

इस्लामला भूभाग नव्हे संपूर्ण जग हवे आहे. इस्लाम एका समाजाची सत्ता संपुष्टात आणून दुसऱ्या समाजाची सत्ता स्थापन करू इच्छित नाही. इस्लामी तत्त्वांचा संपूर्ण मानवजातीला लाभ मिळावा– अर्थातच मानवी उद्धाराच्या तत्त्वप्रणालीचा– जिचे नाव इस्लाम आहे, सर्वत्र प्रचलित व्हावी याकरिताच सर्व शक्तींनिशी क्रांती घडवून आणली जात आहे. या सर्व शक्तींच्या उपयोगाचे एकत्रित नाव आहे जिहाद.

वक्तृत्व व लेखणीद्वारा लोकांच्या विचारांत परिवर्तन घडवून वैचारिक क्रांती निर्माण करणेसुद्धा जिहाद मानले जाते. तलवारीच्या धाकाने जुन्या राक्षसी (जुलमी) जीवनपद्धतीला बदलून जगात नवी न्यायोचित व्यवस्था कायम करणेसुद्धा जिहादच मानले जाते. याकरिता अल्लाहच्या मार्गात कार्यरत राहाणे व आपले सर्वस्व पणाला लावणे म्हणजेच जिहाद होय!

# अल्लाहच्या मार्गाबाबत आवश्यक अटी-शर्ती

इस्लामी जिहाद केवळ जिहाद नसून अल्लाहच्या मार्गातील जिहाद आहे. ते केवळ अल्लाहच्या मार्गातील जिहाद असावे, ही प्रथम अट आहे. 'जिहाद' शब्दाची इस्लामन्वये विशेष व्याख्या आहे. 'फी सबीलिल्लाह' या शब्दाच्या भाषांतराने लोकांत भ्रम निर्माण होतो आणि ते समजतात की लोकांना इस्लामची तत्त्वे जबरदस्तीने स्वीकारण्यास बाध्य करणे म्हणजे 'फी सबीलिल्लाह!' याचे मुख्य कारण लोकांचा संकीर्ण दृष्टिकोन आहे. इस्लाममध्ये या शब्दाचा विशाल अर्थ आहे. जे कार्य जनकल्याणासाठी केले जाते व करणारा स्वत:च्या ऐहिक व सुखसमृध्दीकरिता न करता केवळ अल्लाहच्या मर्जीसाठी करतो तेच कार्य 'अल्लाहच्या मार्गातील कार्य' मानले जाते.

उदाहरणार्थ, जर तुम्ही दानदक्षिणा करून त्याच्या मोबदल्यात जगातच काहीतरी लाभाची अपेक्षा करीत असाल तर ते अल्लाहच्या मार्गातील कार्य मानता येणार नाही. उलट एखाद्या दीनदुबळ्या माणसाला मदत करून अल्लाहला खूश करण्याची तुमची इच्छा असेल तर ते कार्य 'फी सबीलिल्लाह' मानले जाईल. थोडक्यात या शब्दातून असा अर्थ अभिप्रेत आहे की माणसाने संपूर्णत: नि:स्वार्थपणे कार्य करत राहावे व या श्रध्देने करावे की त्यांच्या जनकल्याणकारी कृत्याने ईश्वर प्रसन्न होईल. खरे पाहता मानवी जीवनाचा उद्देशच मुळी विश्वाच्या मालकाच्या (अल्लाहच्या) प्रसन्नतेकरिता कार्य करीत राहणे असा आहे.

'जिहाद'साठी 'फी सबीलिल्लाह' (अल्लाहच्या मार्गातील) ही अट लावण्याचा उद्देशसुद्धा याच कारणास्तव आहे. याचा अर्थ असा की जेव्हा एखादी व्यक्ती वा व्यक्तींचा समूह जीवनपध्दतीत क्रांती घडवून इस्लामी जीवनपध्दतीची व्यवस्था निर्माण करण्याचे कार्य आरंभ करते तेव्हा तिच्या मनात राज्यकर्त्याला बाजूस सारून स्वत: राज्यकर्ता होण्याची अभिलाषा नसते. सत्कार्य करताना स्वत:साठी धनसंपत्ती कीर्ती व मोठेपणा वा सन्मान प्राप्त करण्याची जरासुध्दा इच्छा नसते. त्याच्या संपूर्ण त्याग व तपस्येचा उद्देश मानवांसाठी न्यायोचित जीवनव्यवस्था कायम करणे असा असतो. त्याच्या कष्टाच्या मोबदल्यात त्याला अल्लाहची मर्जी संपादनाशिवाय इतर कोणतीच लालसा नसते.

कुरआन स्पष्टोक्ती आहे,

*''ज्या लोकांनी श्रध्देचा मार्ग अवलंबिला आहे ते अल्लाहच्या मार्गात लढतात आणि ज्यांनी अश्रध्देचा मार्ग अवलंबिला आहे ते तागूतच्या (विद्रोही लोकांच्या) मार्गात लढतात.''*

(तागूत- तुगियान या शब्दापासून बनला आहे. तुगियानचा अर्थ मर्यादांचे उल्लंघन करणे असा होतो. नदी जेव्हा आपल्या सीमेपलीकडे वाहू लागते तेव्हा आपण 'तुगियानी' (पूर) आला असे म्हणतो. त्याचप्रमाणे मनुष्य जेव्हा आपल्या सीमेपलीकडे जाऊन आपल्या शक्तीचा वापर मानवसमाजावर वर्चस्व प्राप्त करण्यासाठी किंवा आपल्या रास्त हक्कांपेक्षा अधिक लाभ प्राप्त करण्यांसाठी प्रयत्न करू लागतो तेव्हा तो तागूतांच्या मार्गाचा अवलंब करतोय असे मानतात.)

याउलट 'अल्लाहच्या मार्गातील युद्धा'चा उद्देश असा आहे की ईश्वराची न्यायव्यवस्था (कायदा) जगात अवलंबिला जावा, प्रयत्नशील व्यक्तीनेसुद्धा त्यावर अवलंब करावा व इतरांनासुद्धा अवलंब करण्यास प्रवृत्त करावे.

म्हणून कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"ते मरणोत्तर जीवनाचे घर तर आम्ही त्या लोकांसाठी खास करू जे पृथ्वीवर आपली शेखी मिरवू इच्छित नाहीत आणि उपद्रवदेखील माजवू इच्छित नाहीत आणि शेवटी भले ईशपरायणांसाठीच आहे.''

(दिव्य कुरआन, २८:८३)

एकदा एका व्यक्तीने अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, ''अल्लाहच्या मार्गातील जिहाद म्हणजे काय? एक मनुष्य मालमत्ता मिळविण्याकरिता युद्ध करतो, दुसरा आपल्या शौर्याच्या प्रसिध्दीसाठी युद्ध करतो. तिसरा शत्रुत्वापायी किंवा सामाजिक प्रतिष्ठेसाठी युद्ध करतो. या सर्वांपैकी कोणाचे युद्ध अल्लाहच्या मार्गातील युद्ध मानले जाईल?''

पैगंबर मुहम्मद (स.) उत्तरले, ''कोणाचेच नव्हे.'' 'फी सबीलिल्लाह' तर अल्लाहचे गुणगान करण्याशिवाय इतर कोणत्याच कारणासाठी होत नाही. दुसऱ्या हदीसमध्ये अशी हकीगत आहे की एखाद्याने युद्ध करताना जर मनातल्यामनात उंट बांधण्यासाठी दोरखंड मिळविण्याची क्षुल्लक इच्छासुद्धा बाळगली असेल, तर तो पुण्याईला मुकतो. ''अल्लाह फक्त त्याच कार्याने प्रसन्न होतो जे केवळ त्याच्या प्रसन्नतेसाठी केले जाते व ते कार्य करताना माणसाच्या मनात वैयक्तिक

वा सामाजिक लाभाबाबत जरासुद्धा विचार येता कामा नये.''

सारांश, जिहादच्या बाबतीत 'अल्लाहचा मार्ग' इस्लामी दृष्टिकोनातून अत्यंत महत्त्वाची अट आहे. स्वार्थासाठी तर सर्वच असतात. आपल्या उद्देशांच्या पूर्तीसाठी तर प्रत्येक जण सतत प्रयत्नशील असतो. मुस्लिम एक क्रांतिकारी समूह आहे. त्याच्या विचारानुसार आपले प्राण, आपली संपत्ती, आपले शरीर, आपले आत्मिक बळ या सर्वांचा उपयोग विरोधकांच्या विरोधाचा विनाश करण्यासाठी करायला हवा. मात्र त्यांना सत्ताभ्रष्ट करून स्वत: सत्ताधारी बनण्याची मनिषा बाळगता कामा नये. उलट विरोधकांचा विरोध नष्ट करून ईशआदेशांचा अंमल सुरू करणे हा त्यांचा उद्देश असला पाहिजे.

'जिहाद' व 'अल्लाहच्या मार्गातील' या दोन्ही शब्दांचे संक्षिप्त विवरण दिल्यानंतर या क्रांतीच्या आवाहनाबाबत इस्लामी दृष्टिकोनाचा खुलासा करू इच्छितो, जेणेकरून जिहादच्या आवाहनाची गरज का निर्माण झाली व त्याचा उद्देश काय आहे हे आपल्या लक्षात येईल.

# इस्लामी क्रांतीचे आवाहन

इस्लामी क्रांतीच्या आवाहनाबाबतचा खुलासा असा आहे,

*''लोकहो, केवळ आपल्या त्याच पालनकर्त्याची आराधना करा ज्याने तुमची निर्मिती केली आहे.''* (दिव्य कुरआन,२ : २१)

इस्लाम केवळ कामगार, जमीन मालक, शेतकरी व कारखानदारांना हाक देत नसून सर्व मानवांना आवाहन करतो व मनुष्याला केवळ मनुष्याचा दर्जा देतो. इस्लाम आवाहन करतो की जर तुम्ही अल्लाहव्यतिरिक्त इतर कोणाची पूजा करीत असाल, आज्ञाचे पालन करीत असाल वा एकनिष्ट राहात असाल तर तसे करू नका. तुमच्यापैकी जर कोणी ईशसामर्थ्याचा दावा करीत असेल तर त्यालासुद्धा झटकून मोकळे व्हा. दुसऱ्याकडून स्वत:ची पूजा करून घेणे वा त्यांना नतमस्तक होण्याची आज्ञा देणे या सर्व गोष्टींचा तुम्हांपैकी कोणालाच अधिकार नाही. तुम्ही सर्वांनी एकाच ईश्वराचे दासत्व स्वीकारायला हवे व सर्व मानवांनी समानतेने वागायला हवे.

*''हे ग्रंथधारकांनो, या एका अशाबाबतीत एकमत होऊ या जी आमच्या सर्वांमध्ये समान आहे. आपण अल्लाहशिवाय कोणाचीही भक्ती करता कामा नये, त्याच्या बरोबरीस कोणासही भागीदार ठरवू नये आणि आपल्यापैकी कोणीही अल्लाहशिवाय इतर कोणास आपला पालनकर्ता मानू नये.''*

(दिव्य कुरआन, ३:६४)

हे विश्वव्यापी व परिपूर्ण क्रांतीचे आवाहन आहे. घोषणा करण्यात आली होती की अल्लाहशिवाय इतर कोणाचीच सत्ता मान्य नाही. स्वत: सत्ताधीश बनून लोकांवर सत्ता गाजविण्याचा कोणालाच अधिकार नाही. कोणीही कोणतेच काम स्वेच्छेनुसार सुरू करू शकत नाही व होणारी कोणतीही घटना (आपल्या शक्तीने) थांबवू शकत नाही. कोणत्याही व्यक्तीस कोणतेही कार्यारंभ करण्यास वा स्थगित करण्यास समर्थ मानणे म्हणजे त्याला अल्लाहच्या सामर्थ्यातला भागीदार मानण्यासारखे होते. हेच सर्व संघर्षाचे कारण आहे. अल्लाहने मानवास ज्या गुणांसह जन्म दिला आहे व जो सरळ जीवनमार्ग दाखविला आहे त्या मार्गापासून विचलित होण्याचे मुख्य कारण आहे अल्लाहचे विस्मरण. त्यामुळे त्याला स्वत:च्या अस्तित्वाचे भान राहत नाही. याचा अटळ परिणाम असा होतो की काही लोक,

कुटुंब वा सामाजिक गट ईशशक्तीचा दावा करू लागतात व आपल्या शक्तीचा गैरवापर करून लोकांना आपले भक्त बनवून घेतात. दुसरी बाब अशी की, अल्लाह व स्वत: च्या विस्मरणामुळे समाजातील एक गट सशक्त व सामर्थ्यवानांचे श्रेष्ठत्व (ईशत्व) मान्य करतो, त्यांच्या आज्ञांचे निमुटपणे पालन करू लागतो व येथूनच जुलूम-जबरदस्ती व सामाजिक पिळवणुकीची सुरुवात होते. इस्लाम याच परिस्थितीला आळा घालू इच्छितो.

अल्लाहचा आदेश आहे,

*''त्या बहकलेल्या लोकांचे आज्ञापालन करू नका जे पृथ्वीतलावर उपद्रव माजवीतात आणि कोणतीही सुधारणा करीत नाहीत.''*

(दिव्य कुरआन, २६:१५१-१५२)

*''कोणत्याही अशा व्यक्तीची आज्ञा पाळू नका ज्याच्या हृदयाला आम्ही आमच्या स्मरणापासून वंचित (रिक्त) केले आहे आणि जो स्वेच्छानुसार आचरण करीत आहे व ज्याचे कर्म न्यूनाधिकावर आधारलेले आहे.''*

(दिव्य कुरआन, १८:२८)

*''अल्लाह अशा अत्याचाऱ्याचा धिक्कार करतो जे अल्लाहने निर्मिलेल्या सरळमार्गात अडथळे निर्माण करतात व त्यास वक्र करू पाहतात.''*

(दिव्य कुरआन, ११:१८-१९)

अल्लाह विचारतो, ज्या छोट्या मोठ्या ईश्वरांचे तुम्ही पूजापाठ करीत आहात त्यांची आराधना योग्य वाटते की त्या एकेश्वराची जो सर्व शक्तिमान आहे? तुम्ही जर त्या एकेश्वराला आराध्य मानले नाही, तर त्या छोट्या व खोट्या आराध्य ईश्वरांच्या मोहमायेतून तुम्हाला कदापि सुटका मिळणार नाही. त्यांचे वर्चस्व तुमच्यावर कायम राहील व ते उपद्रव निर्माण करीत राहातील.

*''जेव्हा हे राजे एखाद्या लोकवस्तीत शिरतात तेव्हा तेथील जनजीवन अस्तव्यस्त करून टाकतात व तेथील प्रतिष्ठितांना अपमानित करतात. हीच त्यांची कार्यपध्दत आहे.''* (दिव्य कुरआन, २७:३४)

*''आणि जेव्हा तो सत्ता प्राप्त करतो, धरतीवर उपद्रव निर्माण करतो, शेतांचे नुकसान करतो व वंशाना उद्ध्वस्त करतो. अल्लाहला उपद्रवी आवडत नाहीत.''*

(दिव्य कुरआन)

येथे पूर्ण तपशील देणे आवश्यक नाही. थोडक्यात सांगायचे म्हणजे की इस्लामचा एकेश्वरत्व व एक ईश्वराची भक्तीचा अर्थ एका विशिष्ट धर्माच्या प्रचाराचा भाग नाही. हे एक सामाजिक क्रांतीचे आवाहन आहे. या आवाहनाचा त्या सर्व व्यक्तींवर परिणाम होत होता. जे धर्माच्या नावावर पुरोहित, राजकारणाच्या निमित्ताने राजे महाराजे व शासक वर्ग, व्यापाराच्या आधाराने महाजन, जमीनदार व सामंतशाह बनून सामान्य माणसावर वर्चस्व गाजवीत होते. त्यांनी स्वत: ईश्वराचे रूप धारण केले होते व आपल्या उच्चवर्णीय वा सामाजिक उच्चस्थानाचा गैरफायदा घेत होते. ते लोकांकडून स्वत:ची भक्ती व आज्ञापालनाची अपेक्षा करीत असत. ते उघड उघड म्हणत,

''माझ्याशिवाय तुमचा दुसरा कोणीही आराध्य नाही.''

''मी तुमचा सर्वांत मोठा पालनकर्ता आहे!''

''मी जिवंत आहे-मला मृत्यू नाही.'' (मी अमर आहे)

''माझ्याहून अधिक शक्तिवान कोण आहे?''

त्यांनी लोकांच्या अज्ञानाचा गैरफायदा घेऊन विविध निरनिराळ्या आकाराच्या मूर्ती निर्माण करून त्यांना ईश्वरांचे रूप दिले व त्यांच्या आधारे लोकांवर आपले श्रेष्ठत्व गाजवीत राहिले. मूर्तिपूजा, अनेकेश्वरत्व व ईशद्रोहाविरूद्ध इस्लामच्या एकेश्वरत्वाचा प्रचार तथाकथित राज्यकर्ते व त्यांच्यासोबत वर्चस्व गाजविणाऱ्या इतर सहकाऱ्यांना क्रोधित करीत होता. याच कारणास्तव एकेश्वरत्वाचा प्रेषितांनी प्रचार करताच राज्यकर्ते त्यांच्याविरुध्द बंड उभारत व धादांत खोट्या तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते प्रेषितांचा विरोध करीत. एकेश्वरत्व केवळ (Meta physical Proposition) सूक्ष्म तात्त्विक प्रस्ताव नव्हता, तर सामाजिक क्रांतीचे आवाहन होते. या आवाहनाचा उच्चार होताच राजकीय गोटात उलथापालथ होण्याचे भय निर्माण झाले होते.

# इस्लामी क्रांतीच्या आवाहनाची वैशिष्ट्ये

नि:संशय सर्वच प्रेषित क्रांतिकारक नेते होते. पैगंबर मुहम्मद (स.) सर्वश्रेष्ठ क्रांतिकारी नेता होते. क्रांतिकारी प्रेषित व जगाच्या इतर नेत्यांमध्ये विशेष फरक जाणवतो. प्रेषितेतर नेता कितीही सदाचारी व नि:स्वार्थी असले तरी ते न्याय व समन्वयाचे स्तर (उंची) प्राप्त करू शकले नाहीत. एकतर ते स्वत: अत्याचारित व पीडित समाजातून पुढे आलेले असत किंवा त्या लोकांच्या सहानुभूतीची भावना घेऊन पुढारी होत असत. ते प्रत्येक बाबतीत समाजाच्या केवळ त्याच वर्गाच्या उत्कर्षाच्या दृष्टिकोनातून प्रयत्न करतात. याचा परिणाम असा होतो की ते नि:पक्षपातीपणे व शुद्ध मानवतावादी दृष्टिकोनातून विचार करीत नाहीत. उलट समाजाच्या एका वर्गाविरुद्ध संताप व तिरस्कार व्यक्त करतात, तर दुसऱ्या वर्गाबद्दल सहानुभूती दर्शवितात. त्यांची एका वर्गाबद्दलची सहानुभूती दुसऱ्या वर्गाकरिता अत्याचारी सिद्ध होते. त्यांच्या मनात शत्रुत्व, हेवा व बदल्याची भावना उपजत असल्यामुळे संतुलित व सामंजस्याचे सामाजिक वातावरण निर्माण करणे शक्य होत नाही की ज्या आधारे संपूर्ण मानवसमाजाचे कल्याण साधता येईल. याच्या विरुध्द प्रेषितांना कितीही छळले गेले असेल व त्यांच्यावर व त्यांच्या सोबत्यांवर (सहकाऱ्यांवर) कितीही जुलूम झाले असतील तरी ते आपल्या क्रांतिकारक कार्यक्रमावर आपल्या वेदनांची छटा उमटू देत नसत. ते सरळसरळ अल्लाहच्या आज्ञेनुसार काम करीत राहिले. अल्लाह मानवी भावनांपासून मुक्त असल्यामुळे त्याचा कोणत्याही एका समाजाशी जवळचा संबंध नसतो किंवा दुसऱ्या समाजाशी नाराजी व शत्रुत्व नाही. त्यामुळे प्रेषित अल्लाहच्या आज्ञेनुसार प्रत्येक बाबतीत नि:पक्षपातीपणे न्यायबुद्धीने वागत असत. म्हणूनच संपूर्ण मानवजातीचे कल्याण साधणे शक्य होते. प्रत्येक व्यक्ती आपल्या सीमारेषेत राहावी असे त्यांचे प्रयत्न होते. प्रत्येकाला त्याचे हक्क प्राप्त व्हावेत, व्यक्तींचे आपापसातले संबंध आपुलकीचे असावेत, तसेच व्यक्ती व समष्टीच्या संबंधात संतुलन कायम व्हावे याकरिता ते प्रयत्नशील असत. त्या कारणास्तव त्यांच्या क्रांतिकारक चळवळीत जातिवादी संघर्ष निर्माण झाला नाही. त्यांनी सामाजिक नवनिर्मितीचे कार्य अशा प्रकारे केले की ज्यामुळे एक वर्ग दुसऱ्या वर्गावर वर्चस्व गाजवू शकला नाही. याउलट त्यांनी जो न्यायोचित मार्ग स्वीकारला त्यामुळे सर्वच लोकांना आर्थिक, ऐहिक व आध्यात्मिक प्रगती करण्याची समान संधी प्राप्त होऊ शकली.

# जिहाद का व कसा?

या संक्षिप्त वक्तव्यात इस्लामला अपेक्षित समाजव्यवस्थेबाबत सविस्तर वर्णन देणे शक्य नाही. मला जे मुख्यत्वे सांगायचे ते असे की इस्लाम केवळ काही रूढीपरंपरा व पूजाअर्चाच्या विशिष्ट पध्दतीचे नाव मुळीच नाही. जगातील सर्व प्रकारच्या जुलमी व उपद्रवी व्यवस्थेचे उच्चाटण करून त्या जागी अशी सुधारित व्यवस्था स्थापित करणे अपेक्षित आहे जिच्या आधारे संपूर्ण मानवजातीचे कल्याण घडून येऊ शकते. या विशाल व सृजनशील क्रांती व सुधारणेसाठी इस्लाम एका विशिष्ट मानवी गटाला वा समाजाला हाक न देता समस्त मानवजातीस आवाहन करीत आहे. इस्लाम अत्याचार व अनिष्ट व्यवहार करणाऱ्या धनवान व राजामहाराजांनासुध्दा अल्लाहने निर्माण केलेल्या सीमेत सामील होण्याचे आमंत्रण देत आहे. सत्य व न्यायाचा स्वीकार केल्याने शांती व सुव्यवस्था कायम करता येईल. इस्लाम मानवांशी शत्रुत्व निर्माण करू पाहात नाही. इस्लाम जुलूम व उपद्रवाचा वैरी आहे. अतिरेकी वृत्तींचा विरोध करणारा आहे. कोणत्याही समाजातील, वंशातील, वर्गातील व देशातील व्यक्ती इस्लामचे हे आवाहन मान्य करते तेव्हा समानाधिकार व समान दर्जा प्राप्त 'हिज्बुल्लाह' अर्थात अल्लाहचा समाज वा मुस्लिम समाज असे त्यांना संबोधिले जाते.

हा मानवी समूह अस्तित्वात येताच आपल्या उद्देशाच्या प्राप्तीसाठी प्रयत्न सुरु करतो. या पक्षाचा मूळ उद्देश इस्लामविरोधी राज्यव्यवस्थेचा अंत करून सामाजिक प्रगतीची समाधानकारक व संतुलित शासनव्यवस्था अस्तित्वात आणणे असा आहे. त्यास कुरआनात 'कलमतुल्लाह' (अल्लाहचा आदेश) असे संबोधिले आहे. हा पक्ष जर राज्यव्यवस्था बदलून इस्लामी शासनव्यवस्था स्थापित करण्याचा प्रयत्न करीत नसेल तर त्याचा मूळ उद्देशच नष्ट होतो, कारण त्याची निर्मिती दुसऱ्या कोणत्याच उद्देशासाठी झालेली नाही. या उद्देशासाठी झटणेच (अर्थात जिहाद करणे) त्याच्या अस्तित्वाचा खरा उद्देश आहे. कुरआनात त्यांच्या स्थापनेच्या संदर्भात असा उल्लेख आहे,

*''तुम्ही सर्वांत उत्तम जनसमूह (लोक) आहात ज्याला मानवांच्या मार्गदर्शनासाठी (त्यांच्या सुधारणे साठी) मैदानात (जगात) आणले गेले आहे. तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारा पासून अलिप्त करता आणि अल्लाह वर श्रध्दा बाळगता.''* (दिव्य कुरआन, ३:११०)

हा समूह धार्मिक प्रवचन करणारा वा धर्मप्रसारकांचा गट (जमात) नसून अल्लाहच्या प्रतिनिधींचा (कार्यकर्त्यांचा) समूह आहे. जगातून अत्याचार, उपद्रव, कलह, दुराचार, अतिरेक व दुष्ट परंपरांना समूळ नष्ट करणे हेच याचे कर्तव्य आहे. 'अरबातुन मिन दूनिल्लाह'चे वर्चस्व नष्ट करून दुराचाराचा अंत व सदाचाराचे वातावरण निर्माण करावे अशी अपेक्षा आहे.

*''त्यांच्याशी तोपर्यंत युद्ध करा जोपर्यंत उपद्रव नष्ट होऊन जीवनव्यवस्था अल्लाहकरिताच होत नाही.'' तसेच ''जर तुम्ही असे केले नाही तर धरतीवर उपद्रव निर्माण होईल. अल्लाहने प्रेषितांना जगात जीवन व्यतीत करण्याचा सरळमार्ग व सत्याचे पालन करण्याची योग्य पध्दत देऊन पाठविले आहे. ज्याच्या आधारे इतर सर्व (जीवन) पध्दतींचे उच्चाटण करून एकाच जीवनपध्दतीचा सर्वांनी अवलंब करावा, अनेकेश्वरवादी ज्यांची इच्छा नसेल (तरीही) त्यांनी हीच जीवनपध्दत अवलंबवावी.''* (दिव्य कुरआन)

या पक्षाने सत्ता संपादन करणे आवश्यक आहे. कारण उपद्रवी समाजव्यवस्था उपद्रवी शासकच निमार्ण करतात व जोपर्यंत उपद्रवी शासनव्यवस्थेचा अंत होऊन सत्ता सदाचारी लोकांच्या हातात एकवटली जात नाही तोपर्यंत सुव्यवस्थित समाजव्यवस्था स्थापित होऊ शकणार नाही. जगाचा उद्धार तर सोडाच या जनसमूहाला आपल्या सत्य जीवनपध्दतीचा दुसऱ्या विचारधारेच्या शासनव्यवस्थेत आपल्या जीवनात अवलंब करता येणार नाही. एखाद्या अनेकेश्वरवादी जीवनपध्दतीचा अवलंब करणे शक्य होत नाही. जेथे त्यांच्यावर भांडवलशाहीच्या जीवनपध्दतीचे वर्चस्व असेल, त्या जुलमी व्यवस्थेच्या कचाट्यातून तो सुटू शकत नाही. त्याचप्रमाणे एक मुस्लिम गैरइस्लामी राज्यात राहून इस्लामी तत्त्वानुसार सहजरीत्या जीवन जगू शकणार नाही. ज्या कायद्यांना तो चुकीचे मानतो, ज्या शासकीय करांना तो निषिद्ध समजतो, ज्या व्यवहारांना तो धर्मबाह्य मानतो, ज्या जीवनपध्दतीस तो मारक समजतो ते सर्वच्या सर्व त्याच्यावर त्याच्या कुटुंबियांवर अशाप्रकारे लादले जातील की तो त्यांच्या जाळ्यातून निसटूच शकणार नाही. याच कारणास्तव जी व्यक्ती वा समूह एका विशिष्ट विचारधारेवर विश्वास करतो, त्यांच्या उद्देशपूर्तीसाठी विरोधी विचारधारेच्या शासनपद्धतीचा अंत करून आपल्या विचारधारेची शासनपद्धत प्रस्थापित करण्याचा तो प्रयत्न करतो. विरुध्द विचारधारेची शासकीय पध्दत अंमलात असेल तर तो स्वत:च्या विचारधारेप्रमाणे

स्वतंत्रपणे जीवन व्यतीत करू शकत नाही. तो जर या बाबतीत दिरंगाई करीत असेल तर तो निश्चितच आपल्या विचारधारेबाबत नुसते ढोंग करीत आहे, असे म्हणावे लागेल.

*''हे पैगंबर (स.) अल्लाह तुम्हाला क्षमा करो. तुम्ही त्यांना जिहादमध्ये सामील न होण्याची परवानगी का दिली? (तुम्ही स्वत: त्यांना परवानगी द्यायला नको होती) जेणेकरून कोण खरा आहे हे तुम्हाला कळाले असते व खोट्यांनाही तुम्ही ओळखले असते. जे लोक अल्लाहवर व अंतिम दिनावर श्रध्दा ठेवतात ते तर कदापि तुमच्याकडे अशी विनंती करणार नाहीत की त्यांना आपल्या प्राण व वित्तानिशी युद्ध करण्यापासून माफ केले जावे. अल्लाह ईशपरायण (श्रध्दावान) लोकांना चांगल्या प्रकारे ओळखतो. अशी विनंती तर तेच लोक करतात जे अल्लाह आणि अंतिम दिनांवर विश्वास करीत नाहीत. त्यांच्या मनात शंका आहे व ते द्विधा मन:स्थितीत आहेत.''* (दिव्य कुरआन ९:४३-४५)

उपरोक्त शब्दांत अल्लाहने उघडपणे म्हटले आहे की जी श्रद्धा खरी आहे, त्याने आपल्या विचारधारेच्या पक्षाचे सरकार सत्तेवर आणण्याकरिता आपला सर्वस्वाचा त्याग करायला हवा. जर विरोधी पक्षाचे (विरोधकांचे) शासन सहन करत असाल तर त्यांची श्रद्धा स्वीकारली आहे हे सिद्ध होते. याचा नैसर्गिक परिणाम असा होईल की इस्लामी विचारधारेवरील तुमचा वरकरणी विश्वास कायम राहणार नाही. सुरुवातीला तुम्ही तुमच्या विरोधी विचारधारा नाराजीने सहन कराल, मग हळूहळू तुम्हाला परिस्थितीची सवय होत जाईल व शेवटी तुम्हीही विरोधी विचारधारेशी सलोखा करू लागाल व विरोधी विचारधारेच्या शासनाच्या अस्तित्वास कायम ठेवण्यास साहाय्य करू लागाल. आपली शक्ती व संपत्ती इस्लामऐवजी इस्लामविरोधी शासनव्यवस्थेच्या अस्तित्वासाठी खर्च करू लागाल व शेवटी इस्लामी विचारधारेचा निषेध करू लागाल. फलस्वरूपात तुमच्या पोकळ, खोट्या व दिशाभूल करणाऱ्या विचारधारेमुळे तुमच्या व श्रद्धाहीन लोकांमध्ये कोणताच फरक राहाणार नाही. पैगंबर मुहम्मद (स.) अशा परिणामाबाबत अगदी स्पष्ट ताकीद करतात, ''अल्लाह, ज्याच्या ताब्यात माझा प्राण आहे त्याची शपथ! तुम्ही एकतर सदाचाराचा आदेश द्या व दुराचारापासून परावृत्त करा. दुराचाऱ्यांचे हात धरून सत्याकडे वळवा नाही तर अल्लाहच्या कायद्यानुसार दुराचाऱ्यांच्या विचारांचे तुमच्या मनावर दु:ष्परिणाम घडून येतील व त्यांच्यासारखेच तुम्ही शापित व्हाल.''

# विश्वव्यापी क्रांती

उपरोक्त चर्चेने हे आपल्या लक्षात आले असेल की इस्लामी जिहादचा उद्देश गैरइस्लामी शासनपध्दतीचा अंत करून इस्लामी शासन स्थापित करणे असा आहे. इस्लामी क्रांती केवळ एक दोन देशांतच नव्हे तर संपूर्ण पृथ्वीवर घडवून आणायची आहे. सुरूवातीस मुस्लिमांनी ज्या भागात ते राहात आहेत तेथे त्यांनी राज्यव्यवस्थेत क्रांती घडवून आणावी. मात्र त्यांचे अंतिम लक्ष्य जागतिक क्रांती (World Revolution) आहे. जी विचारधारा सर्व मानवांच्या उद्धाराच्या उद्देशाने अंमलात आली असेल तिला केवळ एक दोन देशांपर्यंत वा एका विशिष्ट समाजापुरते सीमित करता येत नाही. त्याच्या स्वाभाविक उद्देशानुसार त्यांचे अंतिम लक्ष्य जागतिक क्रांती आहे. सत्याला भौगोलिक सीमांनी बंदिस्त करता येत नाही. सत्य नदी व पर्वताच्या अलीकडे आहे तर त्याचे पलीकडेही पोहचू इच्छिते. सत्य मानवाच्या कोणत्याही समूहापासून लपून राहू शकत नाही. मानवावर ज्या ज्या ठिकाणी जुलूम होत आहे व विषमतेने थैमान घातले आहे तेथे त्याच्या मदतीकरिता सत्य धावून जाऊ इच्छिते. याच कल्पनेचे कुरआनात खालील शब्दांत वर्णन केले आहे,

*''मग काय कारण आहे की अल्लाहच्या मार्गात त्या असहाय स्त्री-पुरूषांकरिता आणि बालकांकरिता लढत नाही. जे दुर्बल असल्यामुळे छळले जात आहेत आणि प्रार्थना करीत आहेत की हे पालनकर्त्या, आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ (कारण) येथील शासक अत्याचारी आहेत.''*

(दिव्य कुरआन,४:७५)

जरी देश व समाजाची विभागणी झाली असली तरी मानवी संबंधांमध्ये एकमेकांबाबत विचित्र आकर्षण आहे. ज्यामुळे कोणताही एक देश शेजारच्या देशाशी वैचारिक व सैद्धान्तिक ताळमेळ जुळविल्याशिवाय प्रभावीपणे अस्तित्वात राहू शकत नाही. म्हणून मुस्लिम समूहाने केवळ स्वत:चे रक्षण व इतरांच्या उद्धारासाठी कोणत्याही एका भूभागावर इस्लामी राज्य स्थापन करून संतुष्ट होऊन बसू नये. आपल्या शक्तीनुसार आपल्या आजूबाजूला आपल्या शासनव्यवस्थेचा विस्तार करायला हवा. त्यांनी आपले आचारविचार संपूर्ण जगात पसरविण्याचे प्रयत्न करावेत व लोकांना आपल्या उद्धारक जीवनपद्धतीचा स्वीकार करण्याचे आवाहन करीत राहावे. मुस्लिम समूह सामर्थ्यवान असेल

तर त्याने विरोधकांच्या सत्तेचा अंत करून इस्लामी शासनव्यवस्था कायम करावी.

याच योजनेनुसार पैगंबर मुहम्मद (स.) यांनी व त्यांच्यानंतर त्यांच्या खलीफांनी कार्य केले. अरबस्तानात मुस्लिमांनी सुरुवातीस इस्लामी शासनव्यवस्थेने याच कार्यपध्दतीचा अवलंब केला. त्यानंतर आजूबाजूच्या देशांनी प्रेषितांच्या आचारविचारांना प्रतिसाद देण्यास नकार दिला, तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांच्याविरुध्द युद्ध करण्याची तयारी केली. तबूकच्या युद्धाने या कार्याची सुरूवात झाली. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यानंतर खलीफा माननीय अबू बकर (रजि.) यांनी रोम व इराणवर हल्ला केला. नंतर दुसरे खलीफा माननीय उमर (रजि.) यांनीही मोहीम यशस्वी केली.

इजिप्त, सीरिया, इटली व इराण इस्लामला साम्राज्यवादी म्हणत असत. त्यांना वाटे, ज्याप्रमाणे पूर्वी काही समाजांनी दुसऱ्या समाजाला गुलामगिरीत ढकलले होते, त्याचप्रमाणे मुस्लिमसुद्धा याच उद्देशाने आगेकूच करीत आहेत. या गैरसमजामुळे इराण व रोमन्सच्या नेतृत्वाखालील लोकांनी मुस्लिमांविरुद्ध युद्ध केले. मात्र जेव्हा मुस्लिमांची क्रांतिकारी जीवनतत्त्वे त्यांच्या लक्षात आली व त्यांची खात्री झाली की हे लोक जुलूम-जबरदस्ती करणारे राष्ट्रवादी नाहीत. तसेच राष्ट्रवाद त्यांचा उद्देश नसून ते केवळ न्यायोचित शासनव्यवस्था कायम करू पाहत आहेत. त्यांचा मुख्य उद्देश साम्राज्यवादी हुकूमशाहीद्वारा अत्याचार करणाऱ्या शासकवर्गाचा अंत करणे आहे. तेव्हा ते स्वत: इस्लामी चळवळीत सामील झाले. ते साम्राज्यवाद व हुकूमशाहीपासून वेगळे झाले. जे लोक युद्धात सामील झाले होते ते परिस्थितीने विवश व नडलेले होते. याच सर्व कारणांमुळे मुस्लिमांना सुरूवातीला युद्धांच्या मोहिमेत आश्चर्यकारक यश प्राप्त झाले. इस्लामी राज्यव्यवस्था कायम होताच इस्लामी समाजव्यवस्थेने प्रभावित होऊन जनता स्वत:हून इस्लामचा स्वीकार करू लागली. एवढेच नव्हे तर इस्लामी जीवनपध्दतीचे पुरस्कर्ते होऊन त्यांनीच इतर देशांमध्ये इस्लामच्या प्रसारकार्याची कामगिरी उत्तमरित्या पार पाडली.

# सकारात्मक व संरक्षणात्मक युद्धाबाबत

वर जे काही वर्णन करण्यात आले आहे. त्यावर जर आपण बारकाईने लक्ष दिले तर सहजरित्या आपल्या लक्षात येईल की आक्रमक व बचावात्मक युद्धाची जी परिभाषा करण्यात आली आहे, ती जिहादच्या बाबतीत लागू होत नाही. हा फरक केवळ सामाजिक गटांच्या किंवा देशांच्या युद्धांना लागू होतो. कारण आक्रमण व संरक्षण या संज्ञा केवळ समाज व देशांच्या बाबतीत वापरता येतील. मात्र जेव्हा एक आंतरराष्ट्रीय जनसमूह एका विशिष्ट विचारधारेच्या प्रचारार्थ मोहीम सुरू करील व सर्व समाजांतील सर्वच धर्मीयांना मानवी दृष्टिकोनातून आपल्या विचारधारेकडे आकर्षित करण्याचे प्रयत्न करील व सर्व समाजांतील लोकांना समान दर्जा प्रदान करण्यास सुरूवात करील, त्यांच्या विचारधारेला विरोध करणाऱ्यांचा राज्यव्यवस्थेला संपुष्टात आणून आपल्या विचारधारेची शासनव्यवस्था कायम करण्याचे प्रयत्न करील तेव्हा आक्रमण व स्वसंरक्षणाच्या संज्ञांचा उपयोग अयोग्य ठरतो.

इस्लामी जिहाद सकारात्मकही आहे व संरक्षणात्मकसुध्दा. ते सकारात्मक आहे कारण ते आपल्या विचारधारेच्या विरोधकांच्या शासनव्यवस्थेवर हल्ला करते व संरक्षणात्मकही आहे कारण स्वत:च्या विचारधारेच्या संरक्षणासाठी मुस्लिम लोक शासनाच्या आधाराची अपेक्षा करतात. एका विचारधारेचा पक्ष असल्यामुळे त्यांचे स्वत:चे घर वा मिळकत नसते ज्यांच्याकरिता त्यांना संरक्षणाचा वा बचावाचा मार्ग अवलंबवावा लागेल. त्यांच्याजवळ केवळ तत्त्वप्रणाली आहे ज्याची ते बाजू घेत आहेत. ते कोणा विरोधकांच्या घरावर हल्ला करीत नाहीत तर त्यांच्या विचारधारेवर (जीवनपद्धतीवर) हल्ला करतात. हल्ल्याचा उद्देश आक्रमण नाही. विरोधकांचे जीवनतत्त्व बदलण्याबाबत सक्ती न करता केवळ त्यांची शासनव्यवस्था हिसकावून घेऊन इस्लामी शासनव्यवस्था स्थापन करणे असा आहे.

# जिझिया कर भरणाऱ्या अश्रध्दावंतांची स्थिती

एखाद्या देशातील राज्यसंस्था उलटून तेथे इस्लामी राज्यव्यवस्था स्थापित झाल्यानंतर तेथील इतर धर्मियांची अवस्था कशी असेल? या प्रश्नाचे उत्तरसुद्धा सहज देता येईल. इस्लामी जिहाद लोकांच्या श्रद्धा व वैचारिक भिन्नता, ईशआराधना वा सामाजिक नियमांबाबत आक्षेप घेत नाही. त्यांना त्याबाबत पूर्ण स्वातंत्र्य देण्यात येते. मात्र इस्लामला न पटणाऱ्या पध्दतीने शासनव्यवस्था अस्तित्वात असावी हे मात्र इस्लामला मान्य नाही. तसेच समाजाच्या उद्धाराला बाधक ठरणाऱ्या गैरइस्लामी पध्दतीचे व्यवहार इस्लामी राज्यात चालू राहावेत हेही मान्य नाही. उदाहरणार्थ, इस्लामी राज्यव्यवस्था स्थापित झाल्यानंतर व्याजबट्ट्याचे सर्व व्यवहार निषिद्ध करण्यात येतील. क्रयविक्रयांवर व आर्थिक व्यवहारांवर बंदी आणली जाईल, वेश्या व्यवसाय व अश्लील कारभार पूर्णपणे बंद करण्यात येतील. मुस्लिमेतर महिलांना शरीरप्रदर्शनाची परवानगी नाकारण्यात येईल, तसेच त्यांना इतस्तत: मोकळेपणाने फिरण्याची परवानगी नसेल, सिनेमांवर नियंत्रण बसविण्यात येईल. अशाप्रकारे इस्लामेतर धर्मियांमधील आचारविचार इस्लामी समाजाच्या उन्नती व उत्कर्ष, तसेच इस्लामी संस्काराच्या सुरक्षेसाठी निषिद्ध ठरविले जातील, कारण त्यांच्या आचरणामुळे उपद्रव व विनाशाची स्थिती निर्माण होऊ शकते.

यासंबंधी इस्लामवर आक्षेप घेणाऱ्यांनी विचार करायला हवा की इस्लामने इतर धर्मियांच्या बाबतीत जितका लवचिकपणा दर्शविला आहे, जगातील कोणत्याच शासनपध्दतीने दाखविलेला नाही. इतर प्रकारच्या राज्यव्यवस्थेत तर इतर धर्मियाना जगणे कठीण केले जाते व शेवटी त्यांना देशांतर करणे भाग पडते. इस्लाम मात्र इतर धर्मियांना सुरक्षितपणे जगण्याची व प्रगती करण्याची संधी प्रदान करतो. इस्लामद्वारे मुस्लिमेतरांना ज्या विशाल दृष्टिकोनाने वागणूक देण्यात येते तसे उदाहरण इतरत्र कुठेच दिसून येणार नाही.

# साम्राज्यवादाची आशंका

पुन्हा एकदा सांगावेसे वाटते, इस्लामनुसार जिहाद केवळ अल्लाहच्या मार्गात करायला हवा व फलस्वरुपात इस्लामी राज्य स्थापन झाल्यानंतर त्यांनी राजामहाराजांना पदच्युत करून स्वतः राजामहाराजा होण्याचे प्रयत्न करता कामा नये. त्यांची स्वतःची सत्ता स्थापन व्हावी व ते अल्लाहच्या दासांना आपले गुलाम बनवून अवैध मार्गाने गरिबांच्या कष्टाचा पैसा प्राप्त करून धरतीवर स्वर्ग निर्माण करण्याचा प्रयत्न करावा यासाठी मुस्लिम जिहाद करीत नाहीत. असले युद्ध अल्लाहच्या मार्गातील युद्ध गणले न जाता तागूताच्या मार्गातील (सैतानाच्या मार्गातील) युद्ध मानले जाईल. अशा राज्यव्यवस्थेचा इस्लामशी दूरचाही संबंध नाही. इस्लामचा जिहाद म्हणजे निव्वळ निःस्वार्थ प्रयत्न असून त्यात स्वतःचे वित्त, ऐहिक सुख व प्राणही गमवावे लागते. जिहाद यशस्वी झाला व सत्ता प्राप्त झाली तर मुस्लिम सत्ताधाऱ्यांवर राज्याच्या जबाबदाऱ्यांचे इतके मोठे ओझे लादले जाते की त्याची रात्रीची झोप व दिवसाचा आरामही त्याला मिळेनासा होतो. तो त्या जबाबदाऱ्यांच्या मोबदल्यात राज्याकडून इतर राज्यकर्त्यांप्रमाणे सुख व ऐश्वर्यसुद्धा प्राप्त करू शकत नाही. शासक असूनही तो एका सामान्य नागरिकापेक्षा श्रेष्ठ तर गणला जाऊ शकत नाही. तो कोणासही नतमस्तक होण्याचा आदेश देऊ शकत नाही. शरियतच्या कायदा व नियमांविरुध्द जाऊ शकत नाही. तो आपल्या नातेवाईकांना, आपल्या आप्तजनांना, एवढेच नव्हे तर स्वतःलाही सामान्य व्यक्तीने केलेल्या आरोपातून एकतर्फी न्याय देऊ शकत नाही. (अर्थात दोषमुक्त करू शकत नाही.) तो त्याच्या हक्कापेक्षा एक पैसाही जास्त घेऊ शकत नाही. तो जमिनीच्या छोट्याशा तुकड्यावर कब्जाही करू शकत नाही. एखाद्या सामान्य माणसाला जितके वेतन पुरेसे होऊ शकते त्यापेक्षा जास्त रक्कम त्याला शासकीय तिजोरीतून घेण्याची अनुमती नसते. तो स्वतःकरिता वैभवशाली महाल उभा करू शकत नाही. त्याच्या मनात नेहमी एकच विचार घोळत असतो की त्याच्या कर्मांचा एक दिवस हिशोब घेतला जाणार आहे. त्याच्या हिशोबात हरामाचा एक पैसा, जबरदस्ती केलेला जमिनीचा एखादा तुकडा, गर्व व घमेंडीचा एखादा शब्द, जुलूम व अन्यायाचे एखादे कृत्य वा आपल्या इंद्रियांच्या इच्छापूर्तीसाठी केलेले एखादे दुष्कर्म आढळून आले तर त्याला कठोर शिक्षा भोगावी लागेल. ऐहिक सुखांचा लोभी मनुष्य चुकूनही इस्लामी

कायद्यानुसार शासनाचा कारभार स्वीकारणार नाही. कारण इस्लामी शासकाची स्थिती बाजारातील एखाद्या दुकानदारापेक्षासुद्धा वाईट असते. दुकानदार तर एका दिवसात खलीफा (इस्लामी शासका) पेक्षा जास्त कमाई करतो व रात्री आरामशीरपणे झोपतो. खलीफाला त्याच्याइतके उत्पन्नही मिळत नाही व रात्री निश्चिंतपणे झोपताही येत नाही.

इस्लामी राज्यव्यवस्थेत व गैरइस्लामी शासनव्यवस्थेत असा जबरदस्त फरक आहे. गैरइस्लामी शासनव्यवस्थेत शासकवर्ग आपले वर्चस्व गाजवत असतात. याच्या उलट इस्लामी राज्यव्यवस्थेत शासकवर्ग नि:स्वार्थ सेवा करीत असतो व सामान्य माणसांपेक्षा जरासुद्धा जास्त मोबदला (धनदौलत) स्वत:करिता राखून ठेवत नाही. इस्लामी शासनातल्या उच्चपदस्थांना जे वेतन मिळत होते त्याची तुलना आजकालच्या आय.ए.एस. अधिकारी किंवा ब्रिटीश साम्राज्यातील आय.सी.एस. अधिकाऱ्याच्या वेतनाची तुलना करून बघा. तुमच्या लक्षात येईल की इस्लामच्या जागतिक प्रसारात व साम्राज्यवादी शक्तीच्या जगावरील कबज्यात जमीन-आसमानचा फरक आहे. इस्लामी राज्यातील इराक, सीरिया, इजिप्तच्या राज्यपालांचे वेतन आजच्या इन्स्पेक्टरपेक्षाही कमी होते. प्रथम खलीफा माननीय अबू बकर (रजि.) केवळ शंभर रूपये मासिक वेतनात एवढे मोठे साम्राज्य सांभाळत होते. माननीय उमर (रजि.) यांचे मासिक वेतन दीडशेपेक्षा जास्त नव्हते. दोन्ही शासनकालांत शासकीय तिजोऱ्या भरलेल्या होत्या. साम्राज्यवादीसुद्धा अनेक देश जिंकत होते व इस्लामचे साम्राज्यही दूरवर पसरत होते. मात्र दोहोंची गुणवैशिष्ट्ये वेगवेगळी होती.

उर्दू शेर : ''परवाज़ है दोनों की इसी एक फ़िज़ा में।

करगस का जहाँ और है शाहीं का जहाँ और।''

(दोन्ही एकाच आकाशाच्या पोकळीत उड्डाण घेत आहेत, मात्र गिधाडचे व शाहीन पक्षाचे स्थान वेगवेगळे आहे.)

# असा आहे जिहादचा महिमा

आता आपण मला विचाराल, आपण इस्लाम, मुस्लिम व जिहाद जे स्वरूप आमच्यासमोर स्पष्ट केले आहे ते आज कुठे लुप्त झाले आहे? जगात इस्लाम, मुस्लिम व जिहादचे तसले स्वरुप तर कुठेच दिसून येत नाही!

हा प्रश्न मला विचारू नका. त्या लोकांना विचारा ज्यांनी इस्लामच्या खऱ्या उद्देशाला बाजूस सारून मुस्लिमांना ताईत, मंत्रतंत्र, जपजाप व संतफकीराकडे नेले आहे. ज्यांनी मोक्ष व उध्दार तसेच सर्व ऐहिक व अध्यात्मिक उद्देशांच्या प्राप्तीसाठी शॉर्टकट शोधून काढला आहे. ज्यांनी कोणतेही कष्ट व जोखीम न घेता केवळ हातात माळ घेऊन जप-जाप केल्याने वा थडग्या (दर्ग्या) तील पीर-वलींच्या आशीर्वादाने सर्व काही साध्य होते, असा विश्वास निर्माण केला आहे. ज्यांनी इस्लामच्या खऱ्या उद्देश व तत्त्वांना तिलांजली देऊन वेगवेगळ्या आडंबराने त्याला झाकून टाकले आहे. ज्यांनी चित्र विचित्र वाद निर्माण करून लोकांची बुध्दी भ्रष्ट करून टाकली आहे. जे इस्लामच्या सत्य स्वरुपास पार विसरून गेलेत. जे स्वत:ला विसरलेत. ज्यांना त्यांच्या स्वत:च्या निर्मितीचे भान राहिलेले नाही.

यावरसुद्धा तुमचे समाधान होत नसेल तर त्यांचे मार्गदर्शक, त्यांचे शासक व उच्चपदस्थांसमोर हा प्रश्न प्रस्तुत करा व विचारा, ज्यांनी इस्लाम स्वीकारला आहे व कुरआन व प्रेषितांवर श्रद्धा ठेवीत आहेत, मग त्यांच्या आज्ञांचे ते पालन का करीत नाहीत? अल्लाह व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदेश व उपदेशांनुसार जीवन का व्यतीत करीत नाहीत? सामुदायिक कुरआन पठण, 'ईदे मीलादुन नबी'च्या मिरवणुका, सभा, अल्लाह व प्रेषितांच्या गुणगौरवांच्या गायनाने ते इस्लामी तत्त्वांची पूर्तता कशी करू शकतील?

त्यांनी इस्लामी कायदे, आदेश व उपदेशांपासून स्वत:ला मुक्त करून, इस्लाम सोपा का करून घेतला आहे? कारण ते या जगाच्या आसक्तीने बंदिस्त झाले आहेत व त्यांच्यात इस्लामी तत्त्वांनुसार कर्म करण्याचे सामर्थ्य राहिलेले नाही. त्यांना कोणताच त्याग न करता अगदी सोप्या मार्गाने मोक्ष मिळवायचे आहे.

– समाप्त –